"मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील अस्थायी पदे दि.०१.१०.२०१८ पासून दि. २८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मृदस १४१७/प्र.क्र. ३६/१७अे**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मंत्रालय, विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**तारीख: १६.१०.२०१८**

वाचा :

१. शासन निर्णय क्रमांक: असंक-१००४/ प्र.क्र. १२ (भाग-२)/२००४/ वित्तीय सुधारणा-१, दि. ०४/१०/२००४
२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि२०१६/ प्र.क्र.८/१६ /विसु-१ दि.११ फेब्रुवारी, २०१६.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र. ०८/१६/आपुक-१, दि. ०३.१०.२०१७.
४. शासन निर्णय शुध्दीपत्रक क्रमांक : पदनि- २०१६/ प्र.क्र. ८/१६/ आपुक-१, दि. १७.१०.२०१७
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/ प्र.क्र.८/ आ.पु.क., दि. ०५.०३.२०१८
६. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक: मृदस १४१७/प्र.क्र. ३६/१७-अे, दि. १३.३.२०१८
७. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क., दि.०७/०९/२०१८
८. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. उसं/मृसमृचा/लेखा/००३२/पदे पुढे चालू ठे/ ५८७/ १८, दि. २७/०९/२०१८

**प्रस्तावना**

मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील ३७७ मंजूर पदांपैकी २२२ स्थायी पदे वगळता उर्वरीत १५५ अस्थायी पदे दिनांक ३१/०९/२०१८ पर्यंत चालू ठेवण्यास या विभागाच्या संदर्भ क्र. ६ येथील दिनांक १३/०३/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली होती. आता, संदर्भ क्र. ७ येथील शासन निर्णयान्वये वित्त विभागाने निर्गमित केलेल्या आदेशानुसार सदर अस्थायी पदे दिनांक ०१/१०/२०१८ पासून दिनांक २८/०२/२०१९ पर्यंत या कालावधीत पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा या योजनेतील ३७७ मंजूर पदांपैकी २२२ स्थायी पदे वगळता उर्वरीत १५५ अस्थायी पदे आकृतीबंधात समाविष्ट असल्याचे अधीन राहून दि.०१/१०/२०१८ ते दि. २८ /०२ /२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. (सोबत विवरणपत्र जोडले आहे.)

या प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०१८-१९ करीता मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा

**मागणी क्र. डी -३**

२४०२, मृद व जलसंधारण
१०१, मृद सर्वेक्षण व चाचणी
(००) (०२) मृद सर्वेक्षण आणि अन्वेषण व मृद विश्लेषण रसायन प्रयोगशाळा
(२४०२ ००३२)

हे आदेश वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६ / प्र.क्र. ८/ १६ / आ.पु.क. दि. ०७. ०९. २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व सचिव (कृषी ) यांच्या मान्येतने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१६१५३६५६९२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash R. Kadam

Digitally signed by Prakash R. Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=944e446a6b36b86a52f12def26aa74e1d37e67433a0ce27e6a2caf774b9795c6, cn=Prakash R. Kadam
Date: 2018.10.16 15:40:30 +05'30'

**(प्रकाश रा. कदम)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत:-

१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
३) कृषि संचालक (निवगुनि), कृषि आयुक्तालय, पुणे.
४) कृषि सहसंचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे
५)सर्व विभागीय कृषि सहसंचालक
६) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
७)सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
८) उप संचालक (मृद सर्वेक्षण व मृद चाचणी), कृषि आयुक्तालय, पुणे
९)प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, पुणे
१०) सर्व जिल्हा शासकीय मृद सर्वेक्षण व मृद चाचणी प्रयोगशाळा
११) वित्त विभाग (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
१२) कार्यासन (२अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवडनस्ती

**शासन निर्णय कृषि व पदुम विभाग मृदस १४१७/ प्र.क्र. ३६ /१७अे**
**दि. १६. १०.२०१८ चे सहपत्र.**

**विवरण पत्र**

| अ क्र | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | मृद सर्वेक्षण व मृद चाचणी अधिकारी | २३ |
| २ | कृषि पर्यवेक्षक | १८ |
| ३ | कृषि सहाय्यक | २० |
| ४ | वरिष्ठ लिपिक | २३ |
| ५ | लिपीक | १५ |
| ६ | अनुरेखक | ० |
| ७ | वाहन चालक | २२ |
| ८ | शिपाई | ३४ |
| | **एकूण** | **१५५** |